**मा.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी व बांद्रा येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी /अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्र.याचिका ०९१६/६९१,६९२,६९३/प्र.क्र.१२७/कार्यासन ११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १ सप्टेंबर , २०१८

वाचा : १. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र.B(W)/६०५४/१९८६/२२९८, दि.२०/८/२०१६
२. मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांचे पत्र क्र.३९२३/२०१६, दि.१/८/२०१५ व क्र.२३६४/१६, दि.७/५/२०१६
३. संचालक, महाराष्ट्र अग्निशमन सेवा संचालनालय यांचे पत्र क्र.मअसे/२०१७/३७/१०५, दि.१८/१/२०१७

**प्रस्तावना :**

मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल जनहित याचिका क्र.२१६/२०१० मध्ये दिलेल्या आदेशांस अनुलक्षून राज्यातील सर्व न्यायालयीन इमारतीचे फायर ऑडीट करण्यात येत असून अग्निशमन यंत्रणा उभारणी/ अग्नीप्रतिबंधक उपाययोजना करण्यात येत आहेत. या अनुषंगाने मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी व बांद्रा येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबतचा प्रस्ताव मा.उच्च न्यायालयाने संदर्भीय अ. क्र.१ नुसार सादर केला आहे. महाराष्ट्र अग्नीशमन सेवा संचालनालय, मुंबई यांच्या संदर्भ क्र.३ च्या पत्रामध्ये निदेश दिल्यानुसार स्थानिक अग्नीशमक अधिकारी यांनी सुचित केलेल्या उपाययोजनाच्या अनुषंगाने सन २०१५-२०१६ च्या दरसूचीवरील अंदाजपत्रके संबंधित शाखा अभियंता (विद्युत) यांनी तयार केली असून उप अभियंता, कार्यकारी अभियंता, अधिक्षक अभियंता, मुख्य अभियंता (विद्युत) सा.बां.विभाग, मुंबई व मा.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांनी साक्षांकित केले आहेत. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार मा.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी व बांद्रा येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्याबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

मा.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी व बांद्रा येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी येणाऱ्या अनुक्रमे रु.२६,२६,९४६/-व रु.२,७५,७३४/- अशा एकूण रु.२९,०२,६८०/- (अक्षरी एकूण रुपये एकोणतीस लाख दोन हजार सहाशे ऐंशी फक्त) इतक्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. सदर न्यायालयीन इमारतीचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र | न्यायालयाचे नाव | अंदाजपत्रकाची रक्कम (रुपये) | सा.बां. विभागाने परिगणित केलेली रक्कम (रुपये) |
|---|---|---|---|
| १ | अंधेरी कोर्ट | २६,८७,१४१ | २६,२६,९४६ |
| २ | बांद्रा कोर्ट | ३,२५,१६९ | २,७५,७३४ |
| | **एकूण** | **३०,१२,३१०** | **२९,०२,६८०** |

मा.मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांच्या अधिपत्याखालील अंधेरी व बांद्रा येथील न्यायालयीन इमारतीमध्ये अग्निशमन यंत्रणा उभारणी / अग्निप्रतिबंधक उपाययोजना करण्यासाठी येणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान, (००) १०७ इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (००), (००) (०१) इलाखा शहर दंडाधिकारी न्यायालये (अनिवार्य) (२०१४ ०२३४) "२७ लहान बांधकामे" या लेखाशीर्षामधून पुरवणी मागणी करुन भागवावा. तसेच त्यापुढील आर्थिक वर्षासाठी आवश्यक तेवढी तरतूद त्या त्या वित्तीय वर्षाचे अर्थसंकल्पीय अंदाज सादर करताना प्रस्तावित करुन त्याअनुषंगाने भागवावा.

सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी स्थानिक अग्नीशमन अधिकारी यांनी निश्चित केलेल्या उपाययोजनांमधील कामे असल्याची खातरजमा करण्याची जबाबदारी मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांची राहील. प्रचलित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रीया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी. स्थानिक अग्नीशमन अधिकारी यांनी सुचविलेल्या उपाययोजनांचे अनुपालन होईल याबाबत मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई यांनी दक्षता घ्यावी.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ. संदर्भ क्र.१४६/इमा.२ दि.६/३/२०१७ अन्वये व त्या विभागाच्या सहमतीने तसेच वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला,उपविभाग-तीन, अनुक्रमांक ४,परिच्छेद क्र.२७(२)(अ) मधील तरतूदीनुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०९०४१६५०२४२३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Santosh Sampatti Navagire

Digitally signed by Santosh Sampatti Navagire
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=214b4345a2842afe7dd0cbda9e8d83579cbedaaaef30f215ceda096e4e407797, serialNumber=0cb1b0de020015cf6d1f800579271f4816460b1802c2ae247dd6dd6f47462cd3, cn=Santosh Sampatti Navagire
Date: 2018.09.04 16:52:09 +05'30'

( सं.सं.नवगिरे )
कार्यासन अधिकारी

**प्रत**

१) प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२) मुख्य महानगर दंडाधिकारी, मुंबई,
३) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई,
४) महालेखापाल (लेखापरीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई,
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
६) निवासी लेखा अधिकारी, मुंबई,
७) वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
८) सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
९) विधि व न्याय विभाग (का.२३), मंत्रालय, मुंबई,
१०) निवडनस्ती (कार्यासन ११)